राज्य वेतन सुधारणा समिती, २००८ च्या अहवालामधील शिफारशींची अमलबजावणी
नियत / एकत्रिकृत वेतनावर असलेल्या अंशकालीन कर्मचाऱ्यांच्या वेतन दरात सुधारणा करणे

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक :- संकीर्ण १२१०/प्र.क्र.३६/सेवा-९**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दि.१० सप्टेंबर, २०१८**

<u>संदर्भ</u> :- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र :- संकीर्ण १२१०/प्र.क्र.३६/सेवा-९, दिनांक - ६ सप्टेंबर, २०१०
२) शासन पूरकपत्र, वित्त विभाग, क्र :- संकीर्ण १२१०/प्र.क्र.३६/सेवा-९, दिनांक - ८ डिसेंबर, २०११
३) शासन पूरकपत्र, वित्त विभाग, क्र :- संकीर्ण १२१०/प्र.क्र.३६/सेवा-९, दिनांक - २४ जून, २०१५

<u>प्रस्तावना :-</u>

राज्य वेतन सुधारणा समिती २००८ च्या शिफारशीनुसार जे कर्मचारी अंशकालिक पदावर काम करतात आणि नियत/एकत्रिकृत वेतन घेतात अशा कर्मचाऱ्यांच्या वेतन दरात वर नमूद केलेल्या वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये खालील विभागांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अंशकालीन कर्मचाऱ्यांच्या एकत्रित वेतनामध्ये सुधारणा करण्यात आली आहे.

| अ.क्र. | विभागाचे नाव | विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अंशकालीन कर्मचाऱ्यांची संख्या |
|---|---|---|
| १ | सामान्य प्रशासन विभाग | ७ |
| २ | पर्यावरण विभाग | १२ |
| ३ | महिला व बाल विकास विभाग | ४८ |
| ४ | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | ९९ |
| ५ | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | ८ |
| ६ | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग | २ |

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.२ च्या शासन पूरकपत्रान्वये गृह, विधी व न्याय, नियोजन, कृषी व पदुम, सार्वजनिक आरोग्य विभागाकडून प्राप्त प्रस्तावानुसार त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अंशकालीन कर्मचाऱ्यांच्या एकत्रित वेतनामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे.

| अ.क्र. | विभागाचे नाव | विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अंशकालीन कर्मचाऱ्यांची संख्या |
|---|---|---|
| ७ | गृह विभाग | ३४ |
| ८ | विधी व न्याय विभाग | ८४० |
| ९ | नियोजन विभाग | २ |
| १० | कृषी व पदुम विभाग | १ |
| ११ | सार्वजनिक आरोग्य विभाग | १०,५७९ |

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ च्या शासन पूरकपत्रान्वये ग्राम विकास विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अंशकालीन कर्मचाऱ्यांच्या एकत्रित वेतनामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे.

| अ.क्र. | विभागाचे नाव | विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अंशकालीन कर्मचाऱ्यांची संख्या |
|---|---|---|
| १२ | ग्राम विकास व जलसंधारण विभाग | ३८७ |

**शासन निर्णय :-**

यासंदर्भात जलसंपदा विभागाने, त्यांच्या अधिपत्याखालील ७ कर्मचाऱ्यांना दि.६.९.२०१० च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार एकत्रित वेतन मंजूरीचा प्रस्ताव आता सादर केला आहे.

याबाबत शासन आता असे आदेश देत आहे की, खाली नमूद केलेल्या विभागातील नियत/एकत्रिकृत वेतनावर असलेल्या अंशकालिक पदावर काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांना सध्या दरमहा मिळत असलेले नियत/एकत्रिकृत वेतन दुप्पट करण्यात यावे, ही वाढीव रक्कम किमान रुपये ६०० व कमाल रुपये १२०० च्या मर्यादेत राहील. रुपये १२०० पेक्षा जास्त नियत/एकत्रिकृत वेतन घेत असलेल्या अंशकालिन कर्मचाऱ्यांच्या वेतनात कोणताही बदल होणार नाही.

वरीलप्रमाणे सुधारित वेतनाचा लाभ खाली नमूद केलेल्या विभागातील कर्मचाऱ्यांना दि.१.९.२०१० पासून अनुज्ञेय करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **विभाग** | **अंशकालीन पदसंख्या** |
|---|---|---|
| १३ | जलसंपदा विभाग | ७ |

सदर शासन पूरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१८०९१०११४६५४८१०५ असा आहे. हा डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhalchandra Jagannath Gadekar

Digitally signed by Bhalchandra Jagannath Gadekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=93c75178c3c4e1daaeb069f4e437a48fd302aabd765450129e4447d5a1da1f2a, serialNumber=d2671e08dbf49e6a42b865d026c3f07bc1eb8254056eab8fa6b4b0fb72dd47ba, cn=Bhalchandra Jagannath Gadekar
Date: 2018.09.10 11:54:07 +05'30'

**(भा.ज.गाडेकर)**
उप सचिव, वित्त विभाग

**प्रति,**

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मंत्री व राज्यमंत्री, जलसंपदा विभाग
४) अ.मु.स./प्र.स./सचिव, जलसंपदा विभाग
५) महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र , मुंबई
६) महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
७) महालेखापाल -२ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
८) महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र नागपूर
९) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१३) लेखा अधिकारी, वेतन पडताळणी पथक (सर्व)
१४) निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-९)